कारागृहातील बंद्यांच्या वकीलभेटी /मुलाखतीबाबतची कार्यपध्दती अवलंबण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : जेएलएम-१३१६/प्र.क्र.८(भाग-१)/तुरुंग-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :-१४ जून, २०१७.

वाचा :- (१) उच्च न्यायालय मुंबई जनहित याचिका क्र. ४६/२०१५ व १६७/२०१५ मध्ये मा.उच्च न्यायालयाचे दि. ०१.०३.२०१७ रोजीचे आदेश.
(२) अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा यांचा दिनांक १२.६.२०१७ चा ईमेल संदेश

**परिपत्रक :-**

राज्यातील कारागृहात बंद्यांना देण्यात येणाऱ्या विविध सोयी सुविधा/ अडचणी या संदर्भात मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ मुंबई येथे दाखल जनहित याचिका क्र. ४६/२०१५ व १६७/२०१५ मध्ये मा. उच्च न्यायालयाने दि.०१.०३.२०१७ रोजी पारित केलेल्या आदेशाचे अनुषंगाने वकीलांनी कैद्यांना भेटण्यासंदर्भात शासन स्तरावरुन आवश्यक त्या सूचना निर्गमित करणे आवश्यक आहे त्यानुसार महाराष्ट्र कारागृह नियमावली मधील प्रकरण क्र. ३१. Facilities to Prisoners, नियम क्र. ७ (ii) नुसार बंदयांना वकील भेट/मुलाखतीची तरतूद आहे तथापि भेटीच्या वेळे संदर्भात त्यामध्ये तरतूद नसल्याने या परिपत्रकाद्वारे राज्यातील सर्व कारागृहातील बंद्यांना वकील भेटीसंदर्भात खालीलप्रमाणे कार्यवाही करण्याबाबत सूचना देण्यात येत आहेत.

१. वकीलांनी विहित नमुन्यात भेटीचा अर्ज करावा व त्यासोबत बार असोसिएशनच्या ओळखपत्राची छायांकित प्रत जोडावी.
२. वकीलांनी आपले ओळखपत्र संबंधीत अधिकारी/कर्मचारी यांना दाखवावे.
३. वकील भेटीचे अर्ज त्याच दिवशी सकाळी ८.०० ते ९.०० दरम्यान मुलाखत नोंदणी कक्षामध्ये स्विकारले जातील व संगणक प्रणालीवर नोंदणी केली जाईल.
४. कारागृह सुरक्षिततेच्या दृष्टीकोनातून तपासणीच्या अधीन राहून वकीलांना मुलाखत कक्षात प्रवेश देण्यात येईल.
५. वकील भेटीसाठी वेळ सकाळी ९.०० ते १०.३० अशी राहील.
६. रविवार व कारागृहीन सुटीच्या दिवशी भेट बंद राहील.

२. उपरोक्त परि.१ मधील सूचना प्रत्येक कारागृहाच्या बाहेरील सूचना फलकावर प्रसिध्द करण्यात याव्यात व त्याचे काटेकोर पालन करण्यात यावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०१७०६१४१७४८२६४९२९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prabhakar Atmaram Sankhe

Digitally signed by Prabhakar Atmaram Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=16ca9b273a3e790c4aab4c479015f44d506ae481c2dc55f48d889691ffa9939a, cn=Prabhakar Atmaram Sankhe
Date: 2017.06.14 17:45:52 +05'30'

**( प्रभाकर संखे )**
कक्ष अधिकारी, गृह विभाग

**प्रत,**

१) मा .मुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय मुंबई -३२
२) मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई -३२
३) अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधार सेवा, महाराष्ट्र राज्य , पुणे
४) शासकीय अभियोक्ता ( फौजदारी शाखा ) उच्च न्यायालय, मुंबई
५) कारागृह उप महानिरीक्षक ( मुख्यालय), पुणे.
६) विशेष पोलीस महानिरीक्षक ( कारागृह) दक्षिण विभाग, मुंबई.
७) कारागृह उपमहानिरीक्षक ( मध्य विभाग), औरंगाबाद
८) कारागृह उपमहानिरीक्षक ( पूर्व विभाग ) नागपूर.
९) सर्व कारागृह अधीक्षक
१०) निवडनस्ती.-तुरुंग-२.